## यजमान संपादिका

भारती सरमळकर (मुंबई)

## : संपादक मंडळ :

सोनाली घाटपांडे (पुणे)
सचिन काकडे (मुंबई)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
शशीकांत रणावरे (ठाणे)


## : संपर्क :

ई साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटर्निटी, मॅरेथॉन चौक
ठाणे – ४००६०४
9869674820

हा अंक विनामुल्य मिळण्यासाठी
तसेच सूचना, अभिप्राय व
प्रतिक्रियांसाठी
netaksharee@gmail.com







## अकांतील सर्व छायाचित्रे
**गुगल**

## मांडणी व सजावट
**भारती सरमळकर**
लास्ट बेंच डिझाईन्स





# “राणी”

(बुद्धिबळाच्या पटावरील एक शोकांतिका)

तुला काळजाशी घेऊन
मी शंभर वेळा
सांगितलं होतं तुला
की तुझी जागा तू सोडू नकोस,
कधी सोडलीच तर
तिरपी जाऊ नकोस,
जरी तिरपं जाण्याची मुभा
दिली आहे तुला विधात्यानं.
पण अखेर डाव असा पडला
की तिरप्या रेषेत
दूरवर उभ्या असलेल्या
बेसावध बिशपला
घायाळ करण्याची प्राणांतिक उबळ
तुला आली;
आणि अविचाराच्या दुर्दम गतीने
तू धावून गेलीस तुफानासारखी
त्या महंताच्या असावधपणावर,
सहजतेनं त्याची हत्या करुन
उभी राहिलीस
त्याच्या रिकाम्या जागेवर
विजयाचं विषारी हास्य
हवेवर पेरीत...
.

.
पण.....
तुझ्या हास्यातील उन्माद
पटावर ओघळून पडण्यापूर्वीच
- तुला कळलंच नाही –
एक क्षुद्र प्यादं
पुढे सरसावलं
इतर दोन प्याद्यांच्या जोरात,
आणि तुझ्या आरस्पानी गळ्यावर
त्याने भिरकावला
एक भीषण दयाहीन फास
आपल्या असंस्कृत मूल्यहीन
सामर्थ्याचा.
आता विफल आहे अभागिनी,
तुझं सौंदर्य
तुझं सिंहासन
तुझ्या पदक्षेपात गुंतलेली
माझी अपेक्षाही.
तीन प्याद्यांनी चिरडलेलं
तुझं शव
पडणार आहे पराभूतपणानं
त्या अटळ खोक्यामध्ये
तू मारलेल्या
बिशपच्या शवावर.

**वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज)**

# “कॅटॅलिस्ट”

डावाच्या शेवटी
आपल्या जीवनपटाकडे वळून पहाताना
म्हाता-या प्याद्याला
दिसली अनेक प्यादी,
घायाळ होवून पडलेली
अनेक हत्ती, उंट, घोडे...
पटाच्या बाहेर,
गाडलेले, जाळलेले, तिरडीवर बांधलेले...
वजीर बनण्यासाठी...झपाटून
मागे न पाहता धावत सुटलेला तो,
आज वजीर झाल्यावर..भान आल्यावर
मागे वळून पहातो तर....
.
.
स्वतःच्या राजाने तुच्छ प्याद्यांसमोर कधीच शरणागती पत्करलेली
वजीर बनण्याच्या वेडापायी,
तिरप्या चाली करत,
शेवटाला पोहोचलेला तो म्हातारा वजीर
उपयोगी पडला फक्त....
.
.
.
हारलेल्या गुणतक्त्यात, दोन गुणांची वाढ करायला

**शंतनू चंद्रात्रे - नाशिक**
chandratre.sc@gmail.com





# “बुद्धिबळ”

दिव्यत्वाच्या अथांग
प्रवाहाने स्तंभित
माझ्यातल्या
अज्ञेय कळकभिन्न भिंतीनी
या शुभ्र वाळवंटात घरं केली
तेव्हापासुन.....
माझ्यासमोरचा
हा तळ बदलून गेला आहे
अवकाशभेदी मंत्रांगणास
या शुभ्र कळपाची
नतमस्तकशी आरंभचाल...
अन पुढल्या प्रत्येक
आज्ञेआधी माझीच...
शुद्ध समाधी...
.
.

.
.
सगळंच उधळलं
मघाच्या धुळीत माजल्या
अजाण भयाणतेने
विझल्या शुभ्र दिव्यांची
रांग वाढत गेली...
वाढत चाललीये
काही पडल्या काळोख्याच्या
भीतींची वेस
त्यांच्या अखंड बेहोष सावल्यात
एका लंगड्या शुभ्र घोड्यासह
शांत उभा
चित्त ठेचाळला “राजा”
डाव तसाच ठेवुन
निघताना म्हणतो
.
हा असा डाव एकट्याने खेळु नये
हरता येत नाही........

**सचिन काकडे - मुंबई**
s.s.kakde@gmail.com



# “माझे जगणे”

माझे जगणे त्यांच्या हाती होते जेव्हां
एका सरळ रेषेतच जगणे, तेव्हां
नाही वळण कुठेही, पुढे जातंच रहायचे
सरळमार्गी असावे, म्हणायचे
बंडखोर मन माझे, बंड करुन उठायचे
काटकोनात वळ म्हणायचे

माझे जगणे माझ्या हाती आले तेव्हां
सरळ जाऊन काटकोनात वळणे
कधी डावीकडे, कधी उजवीकडे
असे बरेच चौकोन करणे
त्या चौकोनांमध्ये फिरत राहणे
त्यात रंगही भरणे, काळे...पांढरे..!!

सोंगट्याही जमविल्या,
काळ्या...पांढ-या...
डाव टाकला बुद्धिबळाचा,
आणि त्या चौकटित राहुन
खेळत राहिले, बुद्धि...आणि बळ,
असेच काहीसे करीत होते

पण रेषा सरळ पडेना
काटकोनात वळण घेईना
आडवी तिडवी, तिरपी, वर, खाली
कशीही रेषा जावू लागली
नागमोडी फिरु लागली
काय करावे कळेना, काहीच सुचेना

एका टप्प्यावर जीवन येऊन थडकले
जीवनपटात डोकावून पाहिले
चकित मी विस्मित की हो झाले
अहाहा... किती सुंदर हे चित्र चितारले...!!
रंग अनेक, फुले झाडे, पक्षीही
तळी, सरोवर, नदी, समुद्रही
आणखीही बरेच काही, बरेच काही..

वर्णन काय अन किती करु मी...!
तरीही बरेच काही राहुनही गेले,
बकुळीचे रोप लावायचे राहून गेले
विमान चितारयचे राहून गेले
स्वर्गास जावे म्हणते विमानात बसून
जाताना बकुळीचा सुवास मागे ठेवून !!

**रजनी अरणकल्ले – पुणे**
rajani.arankalle@gmail.com



# “बेचिराख”

त्याच्या बेभान आवेगाच्या वर्षावातुन
ओसंडणारा
परमोच्च तृप्ततेचा एक स्वर्गीय स्पर्श,
तिच्या दमलेल्या श्वासातुन ओघळून
तिच्या पापण्यांवर रेंगाळताना
तिला बेचिराख करुन गेला....

.

तिच्या कणाकणातुन झिरपणा-या
कस्तुरीगंधानं
आधिच निष्प्रभ झालेला तो,
तिच्या डोळ्यावर चढलेला बेपर्वा कैफ पाहून
स्तिमितच झाला....

.

तिच्या हरण्यामुळे...
आज तो जिंकुनही हरला होता...
त्याच्या जिंकण्यामुळे...
आज ती हरुनही जिंकली होती....!

**धुंद रवी – पुणे**
dhundravi@gmail.com







# “काही खरं नाही”

“कविता पॉस्टिंग आज रात्री १२ वाजेपर्यंत आहे....
त्यानंतर अंकाचे काम सुरु हॉईल”
..
च्यायला...आता?...जमेल?...हॉईल का?
.
शब्दांचा गदारॉळ....
यमकांची जाळपॉळ....
वर कामाचा घॉळ....
च्यायला...आता?...जमेल?...हॉईल का?
.
आठ नोकरांना कामाची ‘किल्ली’ द्यायची
वर एकुलत्या साहेबाला टूल्ली द्यायची
मग फरफटत कवितेला दिल्ली न्यायची
.
च्यायला...आता?...जमेल?...हॉईल का?
काही नाही..रोजचंच साला
.
या कॉंडत वेळेशी काळे-पांढरे करत..
वाट पाहत्या सर्वसमावेशक, मनमर्जी राणीला डावलत
दोन सरळमार्गी पिल्लाची स्वप्ने काही क्षण विसरत
कधी चोचलेची वाकडी नजर चुकवायची..
तर कधी टोमणेची
आणि मग...
.
उगाचच दोन पावले सरळ चालून
अर्ध्यात कुठेतरी लपायचं..बसायचं
मन शांत करायचं..
दोन-चार शब्द वाचायचं..लिहायचं....

.
दैनंदिनी झालीये सर्व..
रोजचचं साला
गाढवाने घॉड्याच पांघरुन घेतल्यासारखं
क्षणभंगुर तर क्षणभंगुर...असॉ..
.
रोजचचं साला
.
मग आज पण करु की..आज तर संधी पण आहे
.
ठरलच मग
चला चला सुरुवात करुया..
..
अरेरे !! मुद्दयाच तर विचारलचं नाही..!!
.
अरे बाबानॉ विषय काय आहे?..
.
च्यायला...आता?...जमेल?...कसं होणार?..

तनवीर सिद्दिकी
siddiqui.tanveer9@gmail.com



# “छाप काटा”

एका अडाण्याचा डाव
त्याला शहाणेसे नांव
राजा वजीरांची सोंगे
सारा सोंगटी बनाव

.

नाणे भिर भिर हॊई
जीव तिरीमिरी हॊई
डॊके येवॊ वा शेपटी
बळी बकरीचा जाई

.

खेळ अजाण पिसाट
लपंडावाचा रानात
कायमचे हरवलॊ
माणसांच्या जंगलात

.

मन साई सुट्टयो म्हणे
जीवघेणे बाळघेणे
लगॊरीच्या चेंडूसाठी
सुन्न बॊटांचे तुटणे

सुनिल सामंत - ठाणे
naamagumjaayegaa@gmail.com



# "बुद्धीबळ"

'सफेद-काळ्या चौकटीत तू एक-एक पाऊल पुढे जा' कुणी म्हणाले
हुकूम त्याचा मानुन मीही डॉळ्यांवरती झापड बांधुन पुढे निघाले

कुणी मुसंडी पुढे मारली चाल चालुनी तिरकी, दुडकी, भलती सलती
कुणी अचानक नियम तोडले, वचन मोडले, मार्ग सोडले, चढले वरती

कुणी कुणाला कुठे दिले शह, कुणी कुणाची घरे हडपली कुण्या पटावर
कधी न झापड दूर करुन मी लक्ष घातले, काढले न चा कधी अचाक्षर

मुकाट माझी चाल चालले, एक एक पाऊल टाकले जपुन स्वतःला
कुणी कातडीबचाव म्हणती, कुणी म्हणे स्वार्थी, मी पर्वा करु कशाला ?

किती विचारी, किती संयमी, स्थितप्रज्ञ मी, गुलामीतही निवांत होते
घडून गेली महाभारते, अधर्मयुद्धे किती तरी स्तब्ध, शांत होते

चिडून सारे सैन्य उधळले, कुणी कुणाचे शस्त्र ओढले, कुणी झिंगले
अखेरचा तो निर्णायक क्षण, बेसावध राजाला उडवुन मीच जिंकले !

**क्रांति साडेकर – नागपुर**
krantisadekar@gmail.com







# “गोष्ट”

लहानपणी ऐकली असेलच सा-यांनी
सिंहाची नी उंदराची गोष्ट...
खोटी वाटत असेल आज....
पण तुम्ही कधी बुद्धिबळ खेळलाय ?
मात करायला काहीच नाही शिल्लक
उंदराचे काही प्यादे आहेत फक्त..
बाकी सब खल्लास...
पण वाट काढत काढत
सापडलाच शेवट तर...
तर...
आपल्या मनावर
शेवटचं घर...
आपणच ठरवणार
कोण उठणार....
एक जीव बदली करुन
जिंकताही येऊ शकतो डाव
प्यादी प्यादी असते
वजीर वजीर !!
तरीपण तिलाही असतेच चाल
तीच असते ढाल...
बड्याबड्यांची...
म्हणूनच ही गोष्ट
आजही आपण
सांगत असतो आपल्या मुलांना
खोटी वाटताना
छोटी वाटताना...!!

**गजानन मुळे**





सहजची सुरु केला खॆळ म्हणूनी
का ऒढला गेलॊ रीत म्हणूनी

मग डावास प्रतिडाव माझाही
शह काटशह झिंग नुसती

कळलेच नाही कधी कसे
जीवनच हॊऊन गेले सारीपाट

जाता येता नडतात उंट घॊडे प्यादी
पदॊपदी बदलतात इथे चाली

जो तो फसवी ज्याला त्याला
हर एक म्हणे मीच शह दिला

कुणा वाटे चाल माझी ऐटीची
उधळत जाई त्यास वाट जो आडवी

तर काही तो-यात तिरके भिडती
मस्तवाल ती चितडत हिंडतॊ

तर कॊणी सदैव घुसतो स्वैर
वाटेल तसे वाटेल तिकडे फिरावे

खरे तर कोणाच्या हातात काहीच नसते
कारण आपण सारेच आहोत प्यादे

नाचवी तॊ सुत्रधार पडद्याआड खरा
बसला आहे मांडून पट दुनियेचा
खेळवून गुंगवून करीसी चेकमॆट, करीसी चेकमॆट

उमगले मग व्यर्थ हे लढणे
घडत होते आजवर ते भ्रम नुसते

जिच्या करिता म्हणूनी लावीला दाव
पॊरका टाकून उठली मला माझा डाव

उधळला मग मी अधुरा तॊ डाव
अन नवे मार्ग खुले हिरव्या पायघडीचे

चॊकट ना उरली ना नियम राहीले
खेळ खेळातच गुंढाळीला
जीवनी मुक्त श्वास भरीला

बुद्धीबळ असे कॊडे उकलाया
ना की कॊड्यातूनी कॊडे विणायला

प्यादे प्यादे साधेल बुद्धी भेद
सुत्रधार ही हॊईल चेकमेट, हॊईल चेकमेट

मंगेश मेढी – तळेगांव दाभाडे
mangeshmedhi2@gmail.com



# “तुझ जिंकण”

शुभ्र स्वप्न
काळोख्या रात्री
हलक्या पावलांनी चालू लागतात
तू जिथल्या तिथे...तिथेच राहून
सारे चुरगळून टाकतोस.
मी ही विचार करुन थकलेली
प्रवाहात वाहत जात जात
खुप काही मागे सोडून आलेली
.
.
नेटक्या चाली करुन
तू उधळून टाकलेला कालचा डाव
मी कसाबसा सावरलाय.
सावल्यांसोबत खेळत खेळत
ठेचाळलेल्या माझ्या मनाला
पुन्हा ओढ तुझ्या गतीची....
कित्येक रात्री
अशाच काढल्यात मी
मूकपणे
तूला जिंकताना पाहत....

**चैताली म्हापसेकर - मुंबई**
chaitu.sach@gmail.com





# “शौडषी”

पटावर एक राणी.. आणि सेना
तिच्या आजुबाजुला सगळी प्यादी
आठ घरांतली तिची भूमी
बाकी सगळी फुकट आबादी

मुकुटाचे काटे..थांबवलेल्या चाली
अजब कारभार कायदे-नियमांचा
काळ्या पांढ-यात विभागलेला
श्वास सुद्धा इथे कलमांचा

इर्षेची तरीही दाद द्यावी
चेकमेट होईस्तोवर लढू पाहतात
सेनेची निष्ठा की पाबंदी राणीची
शेवटीही कोंडाळ करुन राहतात

कितीही अडकवून ठेवली तिला
व्हायचं तेच तरीही होतं
कुठलातरी येतोच एक काळजावर वार
अन पाऊल भलतीकडेच जातं

शह बसता सा-या नियमांना
शेवटी असंही होईलच होईल
कोणीतरी शिपाई राजबिंडा
तिचाही जीव घेऊनच जाईल

संहिता हिस्वनकर - औरंगाबाद
samhita.hiswankar@gmail.com





# “सारीपाट”

सोळा शृंगार करुन,
हलक्याच पावलानं माप ओलांडून,
चौसष्ठ दालनात प्रवेश केला.

मन थरारलं !
श्वेतांबरा की कृष्णा ? मी कोण ?
समोर दिसतय ते सत्य की आभास ?

एक आवाज दुमदुमला.... लढ !
जिंकायचे असेल तरी वा नसेल तरी...लढ !

का लढू ? कशासाठी ? कोणासाठी ?
मनात विचारांचे आढे वेढे,
नवखी मी, पाऊल पडले नकळत पुढे.
एकच गदारोळ सुरु झाला
हल्ला हल्ला गलका झाला

मागे वळुन पाहिले,
सारे दरवाजे बंद !
चित्त भानावर....
मी सत्य असत्याच्या पटावर
जुनाच डाव नव्याने सुरु
अग्निवेदि वरचा मंत्र घोष निनादु लागला,
“कार्येषु मंत्रि करणेशु दासी...”
शृंगाराचे शस्त्र केले,

शिल राखून वार केले
कधी कधी सरळ चाल
तर कधी अश्वारुढ वाटचाल
कधी गजगामिनी
तर कधी अनुगामिनी

सपासप वार,
मरणालाही आनंदाची किनार !
मनात सलणारा जुना घाव,
एक चाल हारल्यावरही, जिंकल्याचा आव !

झुंजत गेले, लढत गेले
सारे संपवून, जुन्या शल्याचे दमन केले...!

**मुक्ता पाठक शर्मा – सिंगापूर**
ds_mukta@yahoo.co.in



# “डाव”

आणल्या सोंगट्या त्यानं
पट ही घातला जरा नेटानं
केली मांडामांड डावाची
लहर त्याला आली खेळायची....!

कोण मिळेल प्रतिस्पर्धी ?

मीच समोर दिसले बापडी
डाव ही मांडला खुबीनं
मला म्हणाला खेळ सबुरीनं....!

चाल....त्याची नेहमीच वाकडी
मी ही नव्हते.. कच्ची खिलाडी
तो खेळतच राहिला
‘खेळ’....
मात्र माझाच झाला....!

‘डाव’ तो हरणार कसा ?
त्यानं तो सहज जिंकला
नव्हे त्याच्या जिंकण्यासाठी
मीच....डाव हातचा सोडला....!

प्रशंसेची हाव त्याला
गेला सांगत जगाला....
म्हणे डाव जिंकला
हरवलं आजही तिला

हसले मी....
मनात माझ्या
कसं सांगू आता त्याला ?

“तू तर राजा डावच जिंकलास”
“मी तर, जिंकले खेळ सारा....!

हरण्यातच सुख असतं....
पाहून तुला जिंकताना......

“डाव”....असाच हा,
खेळायचा असतो
खेळातला असो, वा जीवनातला....
पदोपदी मी हरायचं असतं,
तुझ्या जिंकण्यासाठी
आणि माझ्या त्या...
‘अबोल-प्रेमासाठी’.....!

**मनिषा नाईक (माऊ) – पुणे**
nkmanisha@yahoo.com
nmani15@gmail.com







## “चेकमेट”

मी सरळपणाने साधाच प्रस्ताव मांडला
आणि तू नेहमीच्या बेमुर्वतखोरपणे
काणाडॊळा करुन निघून गेलास
समजलास, जिंकलीस खेळी
“येईल झक्कत मागे मागे...”
मी फक्त हसले, स्वतःशीच

तू बेफिकीरपणे फेकलीस कविता,
मी “छान आहे” म्हटलं,
भरभरुन स्तुतीचे रकाने लिहीले....
समजलास, भुलली....
“जाईल कुठे? गाठ माझ्याशी आहे”
मी पुन्हा....हसलेच फक्त.

तू तर माहीर बुद्धिबळात
गर्वात दिसलेच नाही तुला
छॊटेसे माझे प्यादे.....
राणीचा वेध घेत “चेक” म्हणालास,
इवलसं माझं प्याद पुढे सरसावलं....”चेक-मेट”
तू नाही हसलास....नाहीच हसलास.

छॊट्या छोट्या गॊष्टींत असते रे
जीवनातली सगळी गम्म्त...
नाही उमगले तुला कधीच !
सतत अट्टाहास....स्पर्धेचा, स्वतःला सिद्ध
करण्याचा....

देत राहिलास शह......
माझ्या साध्या कृतींना काटशह मानत....

आणि निघूनच गेलास...डावातून, आयुष्यातून
हाच तुझा चेक-मेट होता, की “त्या” चा ? ....
माझ्या हसण्यावरचा ??
मी तरीही नाही सोडलाय बघ डाव....
हे माझं डॊळ्यात पाणी येईस्तॊवर खळाळतं
हास्य.....
चेक-मेट.....अंतिम !!

**प्रभा प्रभुदेसाई – चेन्नई**
prabhapd@gmail.com



# “डाव चालुच रहायला हवा”

तो नी मी....
बुद्धिबळाचा डाव खेळताना
मी चेक-मेट दिला
हसलो खुषीत मिशीतल्या मिशीत
ती म्हणाली
असा संपवू नये डाव राजा
डाव चालुच रहायला हवा
चालु रहायला हवा
आणि शांतपणे मेलेल्या राजाचा मुडदा उचलून
तिने पुन्हा पटावर उभा केला

**अहं ब्रह्मास्मि**





# “लेटर फ्रॉम बॅटलफिल्ड”

इकडे सगळं ठिक चाल्लयं
अगदी इमाने इतबारे
एकच राहु दे ध्यानी कि,

एकाच स्वप्नात अडकु नकॊ
कधी धवल
कधी कातळ
असा फिरत जा..

देवाला कसं कायम देव्हा-यात ठेवलं
तर पितळ काळं पडतं
आणि
कायम ताम्हणातल्या पाण्यावर ठेवलं
तर शेवाळ धरतं

म्हणून
एकाच स्वप्नात अडकु नको
कधी धवल
कधी कातळ
असा फिरत जा..

बरं इकडे इमाने इतबारे चाल्लयं ठिक
पण एक ठेव ध्यानी

एकाच लाकडातुन बनलेलॊ असतो रे
सगळेच आपण
फक्त ‘त्यांच्या’वर रंधा कमी
म्हणून त्यांच्या ‘उंच्या’ जास्त
अन रंधा आपल्यावर जास्त
म्हणून आपण कमी

काळजी नको, ठिकच आहे म्हणा इकडे
पण ठेव ध्यानी

क्षुद्रागत सेवा,
क्षत्रियागत युद्ध,
संन्याशागत त्याग
हे आपल्या तापल्या टकु-यावर लिहुन ठेवलंय
परमेशाने

कसंय कि..
त्यांच्या ‘चाली’रिती वेगळ्या
अन वेगळ्या आपल्या...

आपल्या सोडल्या ‘घरा’कडे
अडीच पावली माघारी फिरणं-नियमबाह्य
(निघतांना खुंटिवरचे कपडे
अन
कुंकवाचे करंडे
गाठोड्यात बांधुन सोडायचं घर)

माफ – त्यांच्या तिरप्या चाली - माफ
कबुल – त्यांच्या उलट्या चाली – कबुल
मान्य – त्यांची घरबदलीही - मान्य
मंजूर – त्यांची अडीज पावली - मंजूर

पण एक ठेव ध्यानी
‘ते’
कॊणत्याही कर्माच्या टोकाला पोहचुनही
राहतात – ‘तेच’

अन
आपली कर्म टॊकावर पोचली की
आपलंही सगळ्ळं....

माफ,
कबुल,
मान्य,
मंजुर

म्हणून
एकाच स्वप्नात अडकु नकॊ
कधी धवल
कधी कातळ
असा
फिरत जा....



**प्राजक्त देशमुख – नाशिक**
deshmukh.praj@gmail.com

*नेटाक्षरीचा हा अंक तुम्हाला कसा वाटला ? एकूणच हा उपक्रम तुम्हाला आवडला का ? मग तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानबद्दल जाणून घ्यायला नक्कीच आवडेल.*

*२००८ मध्ये स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना जवळ जवळ दोनशे दर्जेदार मराठी ई पुस्तके / ई नियतकालिके विनामूल्य दिली आहेत. मोरया, मीरा, कृष्णा, गुरुदेव रविंद्रनाथ, स्वा. विवेकानंद, विंदा करंदिकर, ना धों महानोर, ग्रेस , नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे चारशे नवीन साहित्यिकांना या व्यासपीठावरून सादर केले. आमचा प्रत्येक अंक, आमचे प्रत्येक पुस्तक ई मेलच्या माध्यमातून साधारणतः सव्वालाख मराठी वाचकांपर्यंत जातो. जगभरात पसरलेल्या पण मनाने महाराष्ट्रातच असणार्या प्रत्येक वाचकापर्यंत जाण्याचा आमचा प्रयत्न आहे. आम्ही इंटरनेटवर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरिरीने पुढे नेली. प्रेम आणि सौंदर्याबरोबरच विद्यार्थी आणि शेतकर्यांच्या आत्महत्या, दहशतवाद, प्रेमभंगातून येणारी निराशा, बालमजूर अशा ज्वलंत विषयांवरचं साहित्य मांडलं. विनोदाला वाहिलेलं ई श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीताची समज तरुणांत वाढण्यासाठी संगीत कानसेनचे ई वर्ग चालवले. नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. नवीन साहित्यिकांचा शोध घेण्यासाठी अक्षर अंकुरची मोहीम चालवली. तर महाराष्ट्रातल्या किल्ल्यांची माहिती देणार्या पुस्तिकांच्या "दुर्ग दुर्गट भारी" या मालिकेद्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगभरातल्या मराठी मंडळींना मराठमोळ्या इतिहासाची उभारी दिली. लवकरच आमचा ई-यत्ता हा ज्ञानवेध घेणारा उपक्रम सुरू होईल. मराठीचं वैभव जे ज्ञानदेव तुकाराम. अशा संतांच्या पुस्तिकांची एक मालिका आपल्या भेटीला येते आहे. केवळ कविताच नव्हे तर कथा कादंबर्या आणि गंभीर विषयांवरची पुस्तकेही आपल्याला इथे मिळतील. तर तरुणांमध्ये नव्या जगाला सामोरं जाण्याची हिंमत जागवणारं "उनाड" आपल्या भेटीला आलं. तुम्हाला हे ई अंक आवडले तर आपल्या मित्रांना फ़ॉर्वर्ड करा. तुमचे अभिप्राय कळवत रहा.*

वरील सर्व ई-पुस्तके विनामुल्य मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता संपर्क :

**esahity@gmail.com**

नेटाक्षरीचे अंक नियमीत मिळण्यासाठी सुचना, अभिप्राय किंवा स्वतःचे साहित्य पाठविण्याकरिता संपर्क :

**netaksharee@gmail.com**

सर्व प्रकशने येथे उप्लब्धः
www.esahity.com

फेसबुक फॅन पेज :
www.facebook.com/esahity

फेसबुकवरील ग्रुप्स :
www.facebook.com/groups/kavyanjali.esahity
www.facebook.com/groups/kaavya.marathi

फेसबुक्वर नेटाक्षरीसाठी येथे कविता देणे :
www.facebook.com/groups/yadny

हा अंक विनामूल्य मिळण्यासाठी ,
आपले साहित्य पाठविण्यासाठी,
सूचना, अभिप्राय, प्रतिक्रियांसाठी,
netaksharee@gmail.com

ई-साहित्य प्रतिष्ठानची सर्व प्रकाशने विनामूल्य मिळण्यासाठी :
esahity@gmail.com

ई-साहित्य प्रतिष्ठानच्या

२०० प्रकाशनांचा

अमुल्य संग्रह आता एका

CD मध्ये उपलब्ध……

ई-साहित्य प्रतिष्ठानचे नवीन ताजं कोरकरकरीत
ई-पुस्तक “रोबॉ” वाचलतं का?

नेटाक्षरीचा ह्या आठवड्याचा अंक
“क्षितीजाच्या पार” मिळाला का?

लवकरचं येत आहे………
“वाटा आणि वळणे” ई-पुस्तक

आमच्या
संकेतस्थळावरील
“कवी कट्टा”
वर एक भेट तर
नक्किच द्या.

आम्ही वाट पाहतोय